**मुंबई शहर, नवी मुंबई, ठाणे येथील शासनाच्या आरे दूध विक्री केंद्रावर तसेच उर्वरीत महाराष्ट्रामध्ये आरे ब्रॅण्डचे दूध महानंद येथून पॅकींग करून विक्री करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एमएलके- २०२३/प्र.क्र.६४/पदुम-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२

दिनांक: १० जूलै, २०२३

**वाचा :**

१. शासन निर्णय क्र. दुविआ-१३१५/प्र.क्र.३६८/पदुम-८, दि.१३.१.२०१६

२. व्यवस्थापकीय संचालक, महानंद यांचे पत्र क्र.महानंद/४ब/आरेदूध/को-पॅकींग/२०२२-२३/०८९७, दि.२६.६.२०२३

**प्रस्तावना:-**

शासनाचे आरे दुग्धशाळेतंर्गत “आरे ब्रॅण्ड” दुधाचे पॅकींग करून विक्री केली जाते. तथापि, आरे ब्रॅण्डचे उत्पादन व वितरण दिनांक २८.८.२०२२ पासून बंद झाले आहे. मुंबई शहरामध्ये आरे दुधाची मागणी लक्षात घेता, सदर दूधाचे पॅकींग महानंद दुग्धशाळा येथून करून विक्री करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र शासनाच्या मुंबई शहर, नवी मुंबई, ठाणे येथील आरे दूध केंद्रावर तसेच उर्वरीत महाराष्ट्रामध्ये आरे ब्रॅण्डचे दूध महानंद दुग्धशाळा, गोरेगांव येथून पॅकींग करून विक्री करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर मान्यता ही १ वर्षाच्या कालावधीसाठी प्रायोगिक तत्त्वावर देण्यात येत आहे. ही मान्यता फक्त “दुध” याकरीताच राहील.

सदर मान्यतेनुसार शासनास अनुकूल अशा अटी व शर्ती आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी आपल्या स्तरावरून निर्गमित कराव्यात. तसेच याप्रकरणी आवश्यक तो करारनामा आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी महानंद यांचेसोबत करावा. करारनामा करतांना शासनाची कोणतीही महसूल हानी होणार नाही याची दक्षता आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी घ्यावी.

महानंद यांचेकडून केल्या जाणाऱ्या दूध विक्री किंमतीच्या (वितरक दर) १% इतकी रॉयल्टी आकारण्यात यावी. प्रत्येेक महिन्याला दूध विक्रीचा तपशिल, त्याची वितरकांची होणारी किंमत याची आकडेवारी महानंदकडून पुढील महिन्याच्या १० तारखेला सनदी लेखापालाच्या प्रमाणपत्रासह सादर करून, त्यानुसार होणारी रॉयल्टीची रक्कम शासनास अदा करणे बंधनकारक राहील. १ वर्षानंतर या कराराचे पुनर्विलोकन करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७१०१७५०४२७५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2023.07.14 15:12:29 +05'30'

**( अश्विनी यमगर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (दुग्धव्यवसाय) यांचे विशेष कार्य अधिकारी,मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (पदु), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., (महानंद), मुंबई
५. प्रादेशिक दूग्धव्यवसाय विकास अधिकारी (सर्व)
६. निवडनस्ती.